**केंद्र शासन सहाय्यीत राष्ट्रीय शीतसाखळी स्त्रोत केंद्र, पुणे करीता कार्यकारी मंडळ व उपसमित्या गठीत करण्यास मान्यता.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः शिप्रकें २०१३/ प्र.क्र.२८२/ आरोग्य-४**
मंत्रालय, १० वा मजला, संकुल इमारत,
गोकूळदास तेजपाल रूग्णालय आवार, मुंबई-४०० ००१.
तारीख: ३० ऑक्टोबर,२०१५.

**वाचा**

१) **शासन निर्णय, सा.आ.वि., क्रमांकः शिप्रकें २०१३/ प्र.क्र.२८२/ आरोग्य-४, दि.२१.११.२०१३.**
२) **शासन निर्णय, सा.आ.वि., क्रमांकः शिप्रकें २०१५/ प्र.क्र.१४८/ आरोग्य-४, दि.१९.१०.२०१५.**
३) **उपसंचालक, आरोग्य सेवा ( परिवहन ), पुणे यांचे पत्र क्रमांकः आसेप/ राशीसाप्रकें/ उपसमिती/ संदर्भअटी मान्यता/ १२८१/२०१५,दि.१७.०७.२०१५.**
४) **संचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांचे पत्र दि.१६.०८.२०१५.**

**प्रस्तावना**

सार्वजनिक आरोग्य विभागाच्या अधिनस्त उपसंचालक, आरोग्य सेवा ( परिवहन), पुणे या कार्यालयात सन १९८३ या वर्षापासून केंद्र शासनाच्या व युनिसेफच्या सहाय्याने शीतसाखळी उपकरणे देखभाल व दुरूस्ती प्रशिक्षण वर्ग भरविण्यात येतात. सदर शीतसाखळी प्रशिक्षण केंद्राचे नांव “राष्ट्रीय शीतसाखळी स्त्रोत केंद्र ” (National Cold Chain Resource Centre ) असे बदलण्यास संदर्भाधीन क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. सदर राष्ट्रीय शीतसाखळी स्त्रोत केंद्राकरीता दिनांक २१.११.२०१३ च्या शासन निर्णयान्वये स्वतंत्र नियामक मंडळाची स्थापना करण्यात आली आहे. सदर नियामक मंडळास वेगवेगळ्या कार्यक्रमांतर्गत कामाचे संनियंत्रण,पर्यवेक्षण व पुनर्विलोकन करण्यासाठी उपसमित्यांना मंजूरी देण्याबाबत निर्णय घेण्याचे अधिकार प्रदान केलेले आहेत. या अनुषंगाने नियामक मंडळाच्या दिनांक २७.०२.२०१५ रोजी झालेल्या दुसऱ्या बैठकीमध्ये या केंद्राचे दैनंदीन कामकाज सूरळीतपणे पार पाडण्याकरीता कार्यकारी मंडळ व उपसमित्या गठीत करण्यात आल्या आहेत. तसेच कार्यकारी मंडळ व उपसमित्यांसाठी संदर्भ अटी निश्चित करण्यात आल्या आहेत. या अनुषंगाने उपसंचालक, आरोग्य सेवा ( परिवहन ), पुणे यांनी प्रस्तावित केल्यानूसार सदर कार्यकारी मंडळ, उपसमित्या तसेच त्यांच्या करीताच्या संदर्भ अटींना मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

सार्वजनिक आरोग्य विभागाच्या अधिनस्त उपसंचालक, आरोग्य सेवा ( परिवहन ), पुणे येथे स्थित केंद्र शासन सहाय्यीत राष्ट्रीय शीतसाखळी स्त्रोत केंद्र, पुणे या केंद्राचे दैनंदिन कामकाज सुरळीतपणे पार

पाडण्यासाठी पुढीलप्रमाणे कार्यकारी मंडळ, उपसमित्या व त्यांच्याकरीता संदर्भ अटींना या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

### १) कार्यकारी मंडळ:-

| अ.क्र. | पदनाम | कार्यकारी मंडळातील भुमिका |
|---|---|---|
| १. | संचालक, आरोग्य सेवा, महाराष्ट्र राज्य, मुंबई | अध्यक्ष |
| २. | अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, कुटूंब कल्याण, माता बालसंगोपन आणि सुरक्षित मातृत्व, पुणे. | सह अध्यक्ष |
| ३. | राष्ट्रीय आरोग्य व कुटूंब कल्याण संस्था, नवी दिल्ली यांच्याकडील संचालकांनी पदनिर्देशित केलेला अधिकारी. | सदस्य |
| ४. | सहसंचालक ( अर्थ ), राष्ट्रीय आरोग्य अभियान, महाराष्ट्र राज्य, मुंबई. | सदस्य |
| ५. | राज्य लसीकरण अधिकारी, कुटूंब कल्याण कार्यालय, पुणे. | सदस्य |
| ६. | सहाय्यक संचालक (अर्थ व प्रशासन ), आरोग्य सेवा, पुणे. | सदस्य |
| ७. | वरिष्ठ सल्लागार व समन्वयक, राष्ट्रीय शीतसाखळी स्त्रोत केंद्र, पुणे. | सदस्य |
| ८. | आय.आय.टी., मुंबई यांच्याकडील पदनिर्देशित अधिकारी. | सदस्य |
| ९. | युनिसेफ, नवी दिल्ली यांच्याकडील पदनिर्देशित शीतसाखळी विशेषज्ञ. | आमंत्रित सदस्य |
| १०. | सहयोगी प्राध्यापक किंवा प्राध्यापक, अभियांत्रिकी महाविद्यालय, पुणे. | आमंत्रित सदस्य |
| ११. | ऑटोमोटीव्ह रिसर्च इन्स्टिट्यूट ऑफ इंडिया, पुणे ( एआरएआय ) यांच्याकडील प्रतिनिधी. | आमंत्रित सदस्य |
| १२. | उपसंचालक, आरोग्य सेवा ( परिवहन ) व राष्ट्रीय शीतसाखळी स्त्रोत केंद्र प्रमुख, पुणे. | सदस्य सचिव |

- **कार्यकारी मंडळाच्या संदर्भ अटी:-**

१) प्रकल्पाचा अंमलबजावणी आराखडा तयार करणे आणि मंजूरीसाठी नियामक मंडळास सादर करणे.
२) प्रकल्प अथवा कार्यक्रमांतर्गत वेगवेगळया मंजूर पदांवर नियुक्त्या करणे.
३) नियामक मंडळाने मंजूर केलेला कृती आराखडा किंवा बाबी अंमलात आणण्यासाठी आवश्यक उपाययोजना करणे.
४) राष्ट्रीय शीतसाखळी स्त्रोत केंद्राचे कार्यान्वयनासाठी बाबनिहाय वार्षीक अर्थसंकल्प आणि अधिकृत खर्च यांचा ताळमेळ तपासणे आणि नियामक मंडळास मान्यतेसाठी सादर करणे.
५) तांत्रिक, वित्त आणि प्रशासकीय बाबींच्या सामंजस्यासाठी आवश्यक बायलॉज तयार करणे व मंजूरीसाठी नियामक मंडळास सादर करणे.
६) राष्ट्रीय शीतसाखळी स्त्रोत केंद्राच्या बायलॉज प्रमाणे आर्थिक वर्षाचे लेखापरिक्षण करण्यासाठी सांविधिक लेखापरिक्षकांची नियुक्ती करणे.
७) राष्ट्रीय शीतसाखळी स्त्रोत केंद्रासाठी प्राप्त निधीच्या वापराबाबत मार्गदर्शक सूचना निर्गमित करणे.
८) राष्ट्रीय शीतसाखळी स्त्रोत केंद्रासाठी नियामक मंडळाने ठरवून दिलेली धोरणे व विविध कार्यक्रम हाती घेणे.

### २) तांत्रिक उपसमिती:-

| अ.क्र. | पदनाम | कार्यकारी मंडळातील भुमिका |
|---|---|---|
| १. | उपसंचालक, आरोग्य सेवा ( परिवहन ) , पुणे. | अध्यक्ष |
| २. | वरिष्ठ सल्लागार व समन्वयक, राष्ट्रीय शीतसाखळी स्त्रोत केंद्र, पुणे. | सदस्य |
| ३. | राज्य लसीकरण अधिकारी, कुटूंब कल्याण कार्यालय, पुणे. | सदस्य |

| अ.क्र. | पदनाम | कार्यकारी मंडळातील भुमिका |
|---|---|---|
| ४. | शीतसाखळी अधिकारी, कुटूंब कल्याण कार्यालय, पुणे. | सदस्य |
| ५. | आरोग्य साधन सामुग्री देखभाल अधिकारी, पुणे. | सदस्य |
| ६. | सल्लागार - प्रशिक्षण, राष्ट्रीय शीतसाखळी स्त्रोत केंद्र, पुणे. | सदस्य |
| ७. | युनिसेफ, नवी दिल्ली यांच्याकडील शीतसाखळी विशेषज्ञ. | आमंत्रित सदस्य |
| ८. | राष्ट्रीय आरोग्य व कुटूंब कल्याण संस्था, नवी दिल्ली यांच्याकडील पदनिर्देशित अधिकारी. | आमंत्रित सदस्य |
| ९. | राष्ट्रीय आरोग्य व्यवस्था स्त्रोत केंद्र, नवी दिल्ली यांचे अंतर्गत राष्ट्रीय शीतसाखळी आणि लस व्यवस्थापन स्त्रोत केंद्र, नवी दिल्ली येथील पदनिर्देशित अधिकारी. | सदस्य |
| १०. | सल्लागार - सुविधा व्यवस्थापन, राष्ट्रीय शीतसाखळी स्त्रोत केंद्र, पुणे. | सदस्य |
| ११. | सल्लागार - तांत्रिक परिक्षण आणि संशोधन, राष्ट्रीय शीतसाखळी स्त्रोत केंद्र, पुणे. | सदस्य सचिव |

- **तांत्रिक उपसमितीच्या संदर्भ अटी:-**

१) प्रकल्पाचा अंमलबजावणी आराखडा तयार करणे आणि मंजूरीसाठी नियामक मंडळास सादर करणे.

२) प्रकल्प/ कार्यक्रमाचे कार्यान्वयन आणि अनुकूलन करण्यासाठी आवश्यकतेनूसार सुधारणा सूचविणे आणि मंजूरीसाठी नियामक मंडळास सादर करणे.

३) नियामक मंडळाने प्रकल्प , कार्यक्रम यांची सोपवलेली जबाबदारी हाती घेणे.

४) नियामक मंडळाने मंजूरी दिलेले कार्यक्रम आणि आराखडे यांची योग्य अंमलबजावणी होण्यासाठी आवश्यक कार्यवाही केली जाईल याची दक्षता घेणे.

**३) वित्त उपसमिती:-**

| अ.क्र. | पदनाम | कार्यकारी मंडळातील भुमिका |
|---|---|---|
| १. | उपसंचालक, आरोग्य सेवा ( परिवहन ) , पुणे. | अध्यक्ष |
| २. | सहाय्यक संचालक (अर्थ व प्रशासन ), आरोग्य सेवा, पुणे. | सदस्य |
| ३. | लेखा अधिकारी, अर्थ व प्रशासन, पुणे. | सदस्य |
| ४. | वरिष्ठ सल्लागार व समन्वयक, राष्ट्रीय शीतसाखळी स्त्रोत केंद्र, पुणे. | सदस्य |
| ५. | सहाय्यक लेखा अधिकारी, पुणे. | सदस्य सचिव |
| ६. | सल्लागार - तांत्रिक परिक्षण आणि संशोधन, राष्ट्रीय शीतसाखळी स्त्रोत केंद्र, पुणे. | सदस्य सचिव |

- **वित्त उपसमितीच्या संदर्भ अटी:-**

१) प्रकल्पाचा अंमलबजावणी आराखडा तयार करणे आणि मंजूरीसाठी नियामक मंडळास सादर करणे.

२) प्रकल्प/ कार्यक्रमाचे कार्यान्वयन आणि अनुकूलन करण्यासाठी आवश्यकतेनूसार सुधारणा सूचविणे आणि मंजूरीसाठी नियामक मंडळास सादर करणे.

३) प्रशासकीय आणि आर्थिक समस्यांसाठी बायलॉज तयार करणे आणि मंजूरीसाठी नियामक मंडळास सादर करणे.

४) राष्ट्रीय शीतसाखळी स्त्रोत केंद्राच्या बायलॉजप्रमाणे आर्थिक वर्षाचे लेखापरिक्षण करण्यासाठी सांविधिक लेखापरिक्षकांची नियुक्ती होण्याबाबत कार्यवाही करणे.

५) राष्ट्रीय शीतसाखळी स्त्रोत केंद्रासाठी प्राप्त झालेल्या निधीचे योग्य विनियोजन होण्यासाठी मार्गदर्शक सूचना निर्गमित करणे.

४) **प्रशासकीय उपसमिती:-**

| अ.क्र. | पदनाम | कार्यकारी मंडळातील भुमिका |
|---|---|---|
| १. | उपसंचालक, आरोग्य सेवा ( परिवहन ) , पुणे. | अध्यक्ष |
| २. | वरिष्ठ सल्लागार व समन्वयक, राष्ट्रीय शीतसाखळी स्त्रोत केंद्र, पुणे. | सदस्य |
| ३. | राज्य लसीकरण अधिकारी, कुटूंब कल्याण कार्यालय, पुणे. | सदस्य |
| ४. | प्रशासकीय अधिकारी, अर्थ व प्रशासन, पुणे. | सदस्य |
| ५. | प्रशासकीय अधिकारी, राज्य आरोग्य परिवहन संघटना, पुणे. | सदस्य |
| ६. | सल्लागार - तांत्रिक परिक्षण आणि संशोधन, राष्ट्रीय शीतसाखळी स्त्रोत केंद्र, पुणे. | सदस्य |
| ७. | सल्लागार - सुविधा व्यवस्थापन, राष्ट्रीय शीतसाखळी स्त्रोत केंद्र, पुणे. | सदस्य सचिव |

- **प्रशासकीय उपसमितीच्या संदर्भ अटी:-**

१) प्रकल्पाचा अंमलबजावणी आराखडा तयार करणे आणि मंजूरीसाठी नियामक मंडळास सादर करणे.

२) प्रकल्प/ कार्यक्रमाचे कार्यान्वयन आणि अनुकूलन करण्यासाठी आवश्यकतेनूसार सुधारणा सूचविणे आणि मंजूरीसाठी नियामक मंडळास सादर करणे.

३) प्रकल्प अथवा कार्यक्रमांतर्गत वेगवेगळया मंजूर पदांवर नियुक्त्या करण्याबाबतची कार्यवाही करणे.

४) प्रशासकीय आणि आर्थिक समस्यांसाठी बायलॉज तयार करणे आणि मंजूरीसाठी नियामक मंडळास सादर करणे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१०२९१३१२५२६३१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ashok T Uike

Digitally signed by Ashok T Uike
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400001, st=Maharashtra, cn=Ashok T Uike
Date: 2015.10.30 11:50:28 +05'30'

**अ.ता.उईके**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संचालक, आरोग्य सेवा, महाराष्ट्र राज्य, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.

२. अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, कुटूंब कल्याण, माता बालसंगोपन आणि सुरक्षित मातृत्व, पुणे.

३. महालेखापाल १ / २, महाराष्ट्र ( लेखा व लेखापरिक्षा ) / लेखा व अनुज्ञेयता, मुंबई/ नागपूर.

४. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.

५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

६. सहाय्यक संचालक ( लेखा व लेखापरिक्षा ),आरोग्य सेवा, पुणे.
७. सहसंचालक, आरोग्य सेवा ( अर्थ व प्रशासन ), पुणे.
८. सहसंचालक, आरोग्य सेवा ( सर्व ).
९. उपसंचालक, आरोग्य सेवा परिमंडळे ( सर्व ).
१०. उपसंचालक, आरोग्य सेवा ( परिवहन ) व राष्ट्रीय शीतसाखळी स्त्रोत केंद्र प्रमुख, पुणे यांच्यामार्फत इतर सर्व संबंधित.
११. कार्यासन अधिकारी ( अर्थसंकल्प ), सा.आ.वि., मंत्रालय, मुंबई.
१२. निवडनस्ती ( आरोग्य-४ ).